ग्रामीण रूग्णालय, सांगोला ता.सांगोला जि. सोलापूर चे ३० खाटांवरुन ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये एक “विशेष बाब” म्हणून श्रेणीवर्धन करण्यास मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२२/ प्र.क्र. १७०/ आरोग्य-३अ**

नवीन मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

दिनांक :- ०९ जुलै, २०२४.

**वाचा :-**

सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांचे पत्र क. आआसे/कक्ष३/टे-७/ग्रारू सांगोला सोलापूर श्रेणी ५० पुणे मं.३६/जा.क्र.२२६९-७०/ दि. २५.०२.२०२२.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण रूग्णालय सांगोला, ता. सांगोला, जि. सोलापूर येथील रुग्णालयाचे ३० खाटांवरून ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करणेबाबत प्रस्ताव आरोग्य सेवा आयुक्तालयाने सादर केला आहे. त्यानुसार याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

जिल्हा सोलापूर येथील ग्रामीण रुग्णालय सांगोला, ता.सांगोला चे ३० खाटांवरून ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करण्यास “एक विशेष बाब” म्हणून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयासाठी विहीत पध्दतीने जागा उपलब्ध करुन तेथे बांधकाम व पदनिर्मिती करणे याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

३. शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा- २ दि. २५.०९.२०१९ मधील तरतूदींनुसार अंदाजपत्रक व आराखडे सादर करण्यात यावेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०८१३२२४६३०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2024.07.09 17:18:05 +05'30'

(अ.भि.मोरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण यांचे खाजगी सचिव.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. संचालक (१), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर) मुंबई.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे .
८. जिल्हा शल्य चिकित्सक, सोलापूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
१०.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सांगोला, सोलापूर
११.वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रूग्णालय, सांगोला, ता. सांगोला, जि.सोलापूर
१२.नियोजन विभाग, (का.१४७२) मंत्रालय, मुंबई.
१३.वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१४.अवर सचिव/का.आ.३, सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई
१५.निवडनस्ती (आरोग्य ३-अ)